**राज्यातील आदिवासी जिल्ह्यामध्ये आदिवासी कुटुंबाच्या परसबागेत फळझाडे व भाजीपाला लागवडीची योजना सन २०२४-२५ मध्ये राबविण्यास रु. ४०.०० लाख एवढया निधीच्या कार्यक्रमास प्रशासकीय मान्यता देणेबाबत. (लेखाशिर्ष- २४०१ A८०६)**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्र.आपयो-२०२४/प्र.क्र. ९०/९अे**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२.
दिनांक- २६ जुलै, २०२४

**वाचा:-**

१. कृषी व पदुम विभाग, शासन निर्णय, क्र. पफयो २००३/प्र.क्र. ८५/फ-२, दि. १६/११/२००३
२. कृषी व पदुम विभाग, शासन निर्णय, क्र. आपयो २०१८/प्र.क्र. १७३/९अे, दि. ०१/१०/२०१८
३. कृषी व पदुम विभाग, शासन शुद्धिपत्रक, क्र.आपयो २०१८/प्र.क्र. १७३/९अे, दि. २०/११/२०१८
४. संचालक फलोत्पादन, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे जा. क्र. कृआ / फलो-३/आपयो २४-२५/२०२४/११७७१, दि. २२/०४/२०२४
५. संचालक फलोत्पादन, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे जा. क्र. कृआ / फलो-३/आपयो/उप्र/२०२४/१३०१४, दि. ०९/०५/२०२४
६. संचालक फलोत्पादन, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे जा. क्र. कृआ / फलो-३/आपयो/दायित्व २३-२४/१३६२०/२०२४, दि. २०/०५/२०२४
७. संचालक फलोत्पादन, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे जा. क्र. कृआ / फलो-३/आपयो/२४-२५/माहिती/१३६१८/२०२४, दि. २०/०५/२०२४
८. संचालक फलोत्पादन, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे जा. क्र. कृआ / फलो-३/आपयो/२३-२४/ला. यादी/१७७८१/२०२४, दि. १०/०७/२०२४

**प्रस्तावना :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत राज्यातील १४ जिल्हयांतील आदिवासी भागातील कुपोषणाचे प्रमाण कमी करण्याच्या उद्देशाने व आदिवासी बांधवांना पौष्टिक आहार पुरविण्यासाठी, आदिवासी कुटुंबाच्या परसबागेत पौष्टीक भाजीपाला व फळांची निवड करुन त्याची लागवड करण्यास प्रोत्साहन देण्यासाठी **"आदिवासी कुटुंबाच्या परसबागेत फळझाडे व भाजीपाला लागवड"** ही योजना राज्यात सन २००३-०४ पासून राबविण्यात येत आहे. सदर योजना सन २०२४-२५ मध्ये राज्यात राबविण्याकरीता रु. ४०.०० लाख निधीचा प्रस्ताव संचालक (फलोत्पादन) यांनी संदर्भ क्र. ४ ते ८ येथील पत्रांन्वये शासनास सादर केला आहे. त्यास अनुसरुन सदर योजना सन २०२४-२५ मध्ये राज्यात राबविण्यासाठी अर्थसंकल्पीत केलेल्या निधीच्या मर्यादेत म्हणजे रु. ४०.०० लाख एवढया निधीच्या कार्यक्रमाला प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती, त्यास अनुसरून शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

**१.** राज्यातील ठाणे, पालघर, पुणे, नाशिक, धुळे, नंदूरबार, जळगांव, अहमदनगर, नांदेड, यवतमाळ, गडचिरोली, चंद्रपूर, अमरावती व गोंदिया या १४ जिल्हयातील आदिवासी कुटुंबाच्या परसबागेत फळझाड व भाजीपाला लागवडीची योजना सन २०२४-२५ मध्ये राबविण्यासाठी अर्थसंकल्पीत केलेल्या रु. ४०.०० लाख (रुपये चाळीस लाख फक्त) एवढया निधीच्या कार्यक्रमाला प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. या शासन निर्णयाद्वारे वितरित करण्यात आलेल्या रक्कमेचे कोषागारातून आहरण व वितरण करण्याकरिता संचालक फलोत्पादन यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून आयुक्तालय स्तरावरील खर्चासाठी सहाय्यक संचालक, लेखा-१ यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच, विभागीय कृषी सहसंचालक स्तरावर विभागीय कृषी सहसंचालक कार्यालयातील लेखाधिकारी, जिल्हा स्तरावर जिल्हा अधीक्षक कृषी अधिकारी, उपविभाग स्तरावर उपविभागीय कृषी अधिकारी व तालुका स्तरावर तालुका कृषी अधिकारी यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. आदिवासी कुटुंबामध्ये कुपोषणाचा प्रश्न मोठ्या प्रमाणावर असल्याने विशेष बाब म्हणून उपलब्ध करून दिलेल्या तरतूदींतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/ उपलेखाशीर्षनिहाय तसेच साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती, जिल्हानिहाय लाभार्थ्यांच्या यादी, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक, संबंधित अपर आयुक्त, आदिवासी विकास, आदिवासी विकास विभाग व कृषि व पदुम विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावी.

४. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, अतिरिक्त आदिवासी उपयोजना क्षेत्रात तसेच आदिवासी उपयोजना क्षेत्राबाहेरील क्षेत्रात विविध योजनांवर केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी. जेणेकरून शासनाला आदिवासी उपयोजना क्षेत्रातील व आदिवासी उपयोजना क्षेत्राबाहेरील योजनांवर होणाऱ्या खर्चावर लक्ष ठेवता येईल.

५. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करून दिलेल्या तरतुदीतून फक्त अनुसूचित जमाती च्या लाभार्थ्यांना लाभ मिळेल याची दक्षता घेण्यात यावी.

६. सदर प्रकरणी इतर कार्यवाही उपरोक्त वाचा येथील क्र. २ मध्ये नमूद केलेल्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार करावी.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०७२६१११०३७२२०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

HEMANT GORAKHNATH MHAPANKAR

Digitally signed by HEMANT GORAKHNATH MHAPANKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT,
2.5.4.20=1775f5c28a439e88c4c15ab3f88d6a6beb26ad2675a8c7a7ff397b2e5305303d, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=6756123D309547BB1E152A6AEB6042BDE4040836DF541FD3620CA87FF8E71CC5, cn=HEMANT GORAKHNATH MHAPANKAR
Date: 2024.07.26 11:24:55 +05'30'

**(हे. गो. म्हापणकर)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राज भवन, मलबार हिल, मुंबई - ३२
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,मंत्रालय, मुंबई-३२.
३) मा.मंत्री (फलोत्पादन) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई-३२.

४) मा. विरोधी पक्षनेते, महाराष्ट्र विधानपरिषद/महाराष्ट्र विधानसभा, विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
५) सर्व सन्माननीय विधानपरिषद/विधानसभा सदस्य, महाराष्ट्र राज्य.
६) मा. मुख्य सचिव, मुख्य सचिव कार्यालय, मंत्रालय, मुंबई - ३२
७) प्रधान सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
९) आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य , पुणे.
१०) आयुक्त (आदिवासी विकास), महाराष्ट्र राज्य, नाशिक.
११) अपर आयुक्त, आदिवासी विकास नाशिक/नागपूर/ठाणे/अमरावती.
१२) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ,पुणे.
१३) संचालक (फलोत्पादन),कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य , पुणे.
१४) सर्व विभागीय कृषि सहसंचालक, महाराष्ट्र राज्य.
१५) सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.
१६) सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, महाराष्ट्र राज्य.
१७) महालेखापाल-१/२(लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा व परिक्षा), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
१८) अधिदान लेखाधिकारी, मुंबई.
१९) सहायक संचालक (लेखा),आयुक्त (कृषि), यांचे कार्यालय, पुणे.
२०) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय ग्रंथालय, विधानभवन, मुंबई.
२१) संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय,मंत्रालय, मुंबई-३२ (प्रसिध्दीसाठी).
२२) कार्यासन अधिकारी, कार्यासन क्र.२ व ९ आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
२३) कार्यासन अधिकारी, कार्यासन क्र. २अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
२४) कार्यासन ९-अे, निवडनस्ती.